कोविड-१९ विषाणूचा संसर्ग / प्रादुर्भाव रोखण्यासाठी कार्यरत असलेल्या विविध विभागातील अधिकारी व कर्मचारी यांनी घ्यावयाच्या दक्षतेबाबतच्य मार्गदर्शक सूचना

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपाऊंड, कॉम्प्लेक्स बिल्डिंग, १० वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई ० ४०० -०१
शासन परिपत्रक क्र. करोना-२०२०/प्र क्र ५८/ आरोग्य ५
दिनांक २५ एप्रिल, २०२०.

प्रस्तावना :

राज्यात कोवीड १९या विषाणुच्या वाढत्या प्रादुर्भावामुळे संसर्गांचे प्रमाण वाढत असल्याचे आढळून येत आहे. यासाठी प्रतिबंधात्मक उपाय म्हणून राज्यात लॉकडाऊन केले असले तरी आपत्कालीन सेवेअंतर्गत आरोग्य / पोलीस / स्वच्छता / विद्युत/ महसुल /ग्राम विकास / शिधावाटप इत्यादी विभागातील अधिकारी / कर्मचारी कार्यरत आहेत. तसेच विभाग व क्षेत्रीय स्तरावरील कार्यालयीन आस्थापना मर्यादीत स्वरुपात सुरु आहेत.

आपत्कालीन परिस्थितीत कार्यरत असलेल्या अधिकारी व कर्मचारी आपले कर्तव्य पार पाडत असतांना काही अधिकारी / कर्मचारी कोवीड १९ने बाधित झाल्याचे निदर्शनास आले आहे.

केंद्र व राज्य शासनाकडून कोवीड १९ प्रतिबंधात्मक उपाययोजनांबाबत सर्व माध्यमातून मोठया प्रमाणात जनजागृतीही करण्यात आलेली आहे. त्यानुसार भविष्यात या आजाराचा संसर्ग टाळण्यासाठी घ्यावयाच्या दक्षतेबाबत खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

परिपत्रक :

- कर्तव्यावर जातांना नियमानुसार विहीत गणवेशाबरोबरच मास्क, हातमोजे व आवश्यकतेनुसार ॲप्रन परिधान करावा.
- कार्यालयात अथवा कामकाजाच्या ठिकाणी साबण, पाणी, व हॅन्ड सॅनिटायझर उपलब्ध असल्याचे खातरजमा करावी.
- आपल्या दैनंदिन कामकाजाला सुरुवात करण्यापुर्वी आपले हात साबण व पाण्याने किमान २० सेकंद स्वच्छ धुवावे. यानंतरच हातमोज्यांचा उपयोग करावा. हातमोजे घातल्यानंतर चेहरा, डोळे, नाक, तोंड यास स्पर्श करु नये. हातमोजे खिशात घालण्याचे टाळावे.
- जेथे सॅनिटायझर उपलब्ध असेल तेथे किमान ७ मिलीलिटर सॅनिटायझर हातावर घेऊन दोन्ही तळहातांना मागेपुढे लावावे. सॅनिटायझर किमान ६० टक्के अल्कोहोल असणारे असावे.
- आपण ज्या कार्यालयात अथवा कर्तव्याच्या ठिकाणी काम करत असू व ज्या वस्तुंना वारंवार हाताने स्पर्श होण्याचा संभव आहे अशा गोष्टींना (दरवाज्याचे हॅन्डल, पाण्याचे नळ इत्यादी) दोन

ते तीन तासाने एक टक्का प्रमाणात सोडीयम हायपोक्लोराईड असलेल्या निर्जतुकीकरण द्रावणाने स्वच्छ करावे.

- हाताने चेहरा, डोळे, नाक, तोंड यास स्पर्श करु नये.
- दैनंदिन काम करत असतांना दोन व्यक्तींमधील कमितकमी अंतर एक मिटर ठेवावे.
- एकत्रित जास्त संख्येने काम करण्याची वेळ आल्यास कामाच्या ठिकाणी छोटे छोट समुह करण्यात यावे जेणेकरुन अपघाताने कोवीड १९ चा जंतुसंसर्ग झाल्यास फक्त त्या समुहातील संपर्क व्यक्तींचे विलगीकरण करणे शक्य होईल व दैनंदिन कामकाजावर विपरित परिणाम टाळता येईल.
- भ्रमणध्वनीचा वापर करतांना शक्यतो स्पिकरफोनचा वापर करावा. भ्रमणध्वनीचा स्पर्श शक्यतो चेहऱ्याला टाळावा.
- कार्यालयातून / कर्तव्याच्या ठिकाणावर आंघोळ करण्याची सुविधा उपलब्ध नसल्यास कर्तव्यावरुन घरी परत गेल्यावर लगेच साबण व स्वच्छ पाण्याने आंघोळ करावी.

**वैय्यक्तिक संरक्षक साधनांचा वापर :**

- स्वच्छता विभाग / आरोग्य विभाग / पोलीस दलात कार्यरत असणाऱ्या अधिकारी व कर्मचारी यांनी त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या वैय्यक्तिक संरक्षक साधनांचा योग्यपणे व नियमित वापर करावा.
- मास्क वापरतांना सदर मास्क तोंड व हनुवटी झाकून जाईल अशा पध्दतीने लावावा. नाकावर ठेवण्यायोग्य भाग नाकाच्या हाडावर बसवावा. मास्कची लेस कानावरुन व मानेच्या मागील बाजूस बांधावी जेणेकरुन आपला चेहरा व मास्क यामध्ये अंतर राहणार नाही याची खात्री करावी. मास्क मानेला लटकवू नये, चेहऱ्यावरील मास्कला स्पर्श करणे टाळावे. मास्क ओलसर झाल्यास तो त्वरीत बंद कचरापेटीत शक्यतो कागदात लपेटून फेकावा व नविन मास्क घालावा. मास्क काढतांना प्रथमत: खालील बाजूने काढावा नंतर लेसचा वापर करुन मास्क हाताळावा. मास्क काढतांना मास्कचा शरीराच्या इतर कोणत्याही भागास स्पर्श होणार नाही याची काळजी घ्यावी. त्याचप्रमाणे वापरलेले मास्क, रबरी हातमोजे इत्यादीची विल्हेवाट बंद कचरापेटीत करावी.
- सर्व अधिकारी व कर्मचारी यांनी एकमेकांचे मोबाईल फोन, रुमाल, पाणी बॉटल, ग्लास इत्यादी बाबी वापरु नयेत अथवा हाताळू नयेत.
- सर्व विभागप्रमुख कार्यालय प्रमुख यांना आपल्या अधिनस्थ अधिकारी व कर्मचारी यांना त्यांच्या कर्तव्याशी निगडीत तांत्रिक क्षमतेचे पर्सनल प्रोटेक्टीव्ह किट, हॅन्डग्लोव्हज, अॅप्रन, स्वच्छता कर्मचाऱ्यांना गमबूट, जॅकेट, रबरी हातमोजे, मास्क, साबण व सॅनिटायझरचा आवश्यकतेनुसार पुरवठा करावा.

सर्व कार्यालय प्रमुखांना उपरोक्त नुसार सूचना कर्तव्यावरील अधिकारी व कर्मचाऱ्यांसाठी प्रसारित करण्यात व या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी होते किंवा नाही याची पडताळणी करण्यासाठी नोडल अधिकारी यांची नेमणूक करावी व आपले अधिनस्थ अधिकारी व कर्मचारी कोवीड १९ पासून बाधित होणार नाहीत याची दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(डॉ. प्रदीप व्यास)
प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा. मंत्री (आरोग्य), मंत्रालय, मुंबई
५) मा. राज्यमंत्री (आरोग्य) मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
७) सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुबई
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
११) जिल्हाधिकारी (सर्व)
१२) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
१३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई / पुणे
१४) प्रत उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ (सर्व)
१५) प्रत जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
१६) प्रत जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
१७) निवड नस्ती-आरोग्य ५